प्रशासकीय मान्यता
सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात राज्य योजनातंर्गत मंजूर अनुदानातून यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदीस प्रशासकीय मान्यता.

कामा व आल्ब्लेस रुग्णालय, मुंबई

महाराष्ट्र शासन
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय, क्रमांक : सीएचएम-२०२१ /प्र.क्र.२६२ / प्रशा-१
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय,
९ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई -४०० ००१,
दिनांक : २० सप्टेंबर, २०२१

वाचा : १) शासन निर्णय,उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र. ८२/ भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.
३) शासन निर्णय,उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक संकीर्ण-२०१४/प्र.क्र. २१५/उद्योग-४, दिनांक २४.०८.२०१७
४) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र. संवैशिवसं /यंसाख / कोविड - १९ /कावआरु, मुंबई /रायो /म / ९७५४ /२०२१, दिनांक १४.०७.२०२१

शासन निर्णय :

उपरोक्त नमूद दिनांक १४.०७.२०२१ च्या पत्रान्वये संचालनालयाने विभागाच्या नियंत्रणाखालील कामा व आल्ब्लेस रुग्णालय, मुंबई या संस्थेत कोविड १९ उपाययोजनेतंर्गत ५० खाटांचा स्वतंत्र पेड्रीयट्रीक कोविड कक्ष स्थापित करण्यासाठी आवश्यक यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात राज्ययोजनातंर्गत मंजूर अनुदानातून रुपये ५,०२,१४,०००/- (अक्षरी रुपये पाच कोटी, दोन लक्ष, चौदा हजार फक्त) इतक्या किंमतीची खालील तक्त्यात नमूद यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी करण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र | यंत्रसामुग्रीचे नांव | नग | प्रति नग किंमत | एकूण अंदाजित किंमत |
|---|---|---|---|---|
| १ | पेडियाट्रीक व्हेंटीलेटर वीथ हुमिडीफायर ॲण्ड कॉप्रेसर | ५ | १४००००० | ७०००००० |
| २ | पेडियाट्रीक बेड विथ रॅलिंग | ५० | ८०००० | ४०००००० |
| ३ | क्रॅश कार्ट ट्रॉली | २ | ६५००० | १३०००० |
| ४ | डिफीब्रीलेटर | २ | ३५०००० | ७००००० |
| ५ | पोर्टेबल एक्सरे मशिन | २ | ४००००० | ८००००० |

| अ.क्र | यंत्रसामुग्रीचे नांव | नग | प्रति नग किंमत | एकूण अंदाजित किंमत |
|---|---|---|---|---|
| ६ | पोर्टेबल इसीजी मशिन विथ १२ लिड | ३ | ३००००० | ९००००० |
| ७ | पोर्टेबल युएसजी मशिन | २ | २४००००० | ४८००००० |
| ८ | पोर्टेबल २ डी इको मशिन | २ | २४००००० | ४८००००० |
| ९ | एबीजी अनलायझर | २ | ३०००००० | ६०००००० |
| १० | ऑटोक्लेव्ह मशिन | ४ | ६००००० | २४००००० |
| ११ | मल्टीपॅरामिटर मॉनिटर | २० | ३००००० | ६०००००० |
| १२ | नॉन इन्व्हेसिव्ह बीपी मॉनिटर | १० | २५०० | २५००० |
| १३* | ग्लूकोमिटर ॲण्ड डेक्ट्रोस्टीक | ५ | २००० | १०००० |
| १४ | सिरींज पंप | ४० | ३५००० | १४००००० |
| १५ | स्टेटोस्कोप | २० | ६०० | १२००० |
| १६ | पल्स ऑक्सीमिटर | २० | ५०००० | १०००००० |
| १७ | लॅरींजोस्कोप | ४ | १५००० | ६०००० |
| १८ | नॉन इन्व्हॉसिव्ह व्हेंटीलेटर विथ एनआयव्ही मास्क | २ | ४५०००० | ९००००० |
| १९ | ऑक्सीजन पोर्टेबल सिलेंडर | २ | २०००० | ४०००० |
| २० | इन्स्ट्रयूमेंट ट्रे | १० | २००० | २०००० |
| २१ | हाय स्टूल फॉर पोसिजर | २ | २०००० | ४०००० |
| २२ | आयव्ही स्टॅन्ड | २५ | २००० | ५०००० |
| २३ | न्युओनेटल ट्रॉली विथ आवेरहेड आर्म | २० | ४५००० | ९००००० |
| २४ | फोटोथेरापी युनिट | २ | १००००० | २००००० |
| २५ | बिलीरुबीनोमिटर | १ | ३५०००० | ३५०००० |
| २६ | ऑक्सीजन हुड | १५ | १०००० | १५०००० |
| २७ | ब्रेस्ट मिल्क पंप | २ | १०००० | २०००० |
| २८ | न्युओनेटल व्हेन्टीलेटर | ५ | १५००००० | ७५००००० |
| २९ | थेरमोमिटर | १० | २०० | २००० |
| ३० | नेबुलायझेशन मशिन | २ | २५०० | ५००० |
| एकूण | | | | ५,०२१,४,००० |

अटी :-

१. सदर यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदीची प्रशासकीय मान्यता राज्य योजनातंर्गत मंजूर अनुदानातून प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन

निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ व अनुषांगिक शासन निर्णयांमध्ये मध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

३. सदर यंत्रसामुग्री खरेदीविषयक प्रक्रिया “औषधे, तद्अनुषंगिक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे या बाबींची खरेदी हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉपोरेशन लि. मार्फत करण्याबाबत” निर्गमित शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करावी.

४. सदर यंत्रसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री संचालक (वैद्यकीय शिक्षण) यांनी करावी.

५. सदर यंत्रसामुग्रीसाठी कोणत्याही नवीन बांधकामाची, विद्युतीकरणाची तसेच नवीन पदनिर्मीतीची आवश्यकता नसल्याची खातरजमा करण्यात आलेली आहे.

६. सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार यंत्रपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे संचालक (वैद्यकीय शिक्षण) यांनी प्रमाणित करावे.

७. प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भुत केलेला नसल्याबाबत व सदर यंत्रसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत संचालकांनी खात्री करावी.

८. मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

९. सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली मंजुर अनुदानाच्या तरतुदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०. उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे राज्यस्तरीय खरेदी समितीने अनुपालन करावे. सदर तरतूदीचे अनुपालन केलेल्या यंत्राच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

११. समान स्वरुपाची व समान विनिर्दिष्टे असलेल्या यंत्रसामुग्री व साधनसामुग्रीची एकच निविदा प्रसिध्द करणेबाबतची कार्यवाही हाफकीन महामंडळाने करावी. अशा प्रकारे निविदा प्रसिद्ध करणे हाफकीन महामंडळास शक्य होईल यानुषंगाने संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई यांनी यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदीची मागणी नोंदवावी.

१२. रुपये तीन लक्ष पेक्षा कमी किंमतीची तथापि एकापेक्षा अधिक संस्थांना आवश्यक असणारी यंत्रसामुग्री व साधनसामुग्रीची मागणी एकत्रित करून अशा बाबींची खरेदी हाफकीन महामंडळामार्फत करण्यात येईल.

१३. संस्थास्तरावर खरेदी करण्यात येणा-या यंत्रसामुग्रीची खरेदी शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ च्या खरेदी धोरणातील कार्यपद्धतीनुसार करतांना याबाबत सदर खरेदी शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक

संकीर्ण २०१४ /प्र.क्र.२१५ /उद्योग-४, दिनांक २४.०८.२०१७ अन्वये विहित करण्यात आलेल्या गव्हर्नमेंट ई मार्केटप्लेस (GeM) पोर्टल कार्यपद्धतीचा वापर करावा.

२. प्रस्तुत विषयी यंत्रसामुग्रीसाठी येणारा खर्च खालील लेखाशिर्षातून भागविण्यात यावा.

| मागणी क्र.एस.४ | | |
|---|---|---|
| ४२१० | - | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य |
| ०३ | - | वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन |
| १०५ | - | विषमचिकित्सा - राज्ययोजनांतर्गत योजना |
| (००) (३७) | - | शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालये यांचे बळकटीकरण व श्रेणीवर्धन आणि यंत्रसामुग्री |
| ५२ | - | यंत्रसामुग्री व साधनसामुग्री (४२१० १६२९) |

३. सदर शासन निर्णय, शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचासंकेताक २०२१०९२०१७०९४७२४१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Babanrao Surwase

Digitally signed by Prakash Babanrao Surwase
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=80b7aac85d2bc48d92746fc668ed758d69aeddf95746d0042863b2a0ce71dc1f, pseudonym=22F9E51BE81F4F3AE79C3DF8E5A0EFCCC3354857, serialNumber=6B133E92365A7935768A9BFA0220E77FC95C2726F4A9EB86D8D0C7E623A2B976,
cn=Prakash Babanrao Surwase
Date: 2021.09.20 18:02:28 +05'30'

(प्रकाश सुरवसे)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार - १/२ (लेखा परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई
२. व्यवस्थापकीय संचालक, हाफकीन बायो फार्मास्युटीकल्स् कॉर्पोरेशन लि., मुंबई.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
४. अधिष्ठाता, सर ज.जी. समूह रुगणालये
५. अधीक्षक, कामा व आल्ब्लेस रुग्णालय, मुंबई
६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
७. निवासी अधिकारी, मुंबई
८. निवडनस्ती (प्रशा-१)